**रामेती खोपोली संस्थेच्या प्रस्तावित नविन वसतिगृह बांधकामासाठी सन २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम)३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.१३६४.५६ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१४६/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२३

**वाचा :**

१. संचालक(आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. कृआ.पुणे/नस्ती/आत्मा(वि.प्र.५)शाखा/प्र.क्र.१२/२४९१९/२०२३, दि. २८.०७.२०२३
२. संचालक, वनामती यांचे पत्र क्र. वनामती/बांधकाम/निधी मागणी/२७२७/२०२३, दि.२६.०७.२०२३
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(को)/प्रकल्प शाखा/२५४४, दि.१८.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली आणि राज्यातील नागपूर, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयानुसार नागपूर येथील शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या.

रामेती, खोपोली येथे सध्या अस्तीत्वात असलेली वसतीगृहाची इमारत १९७४ मध्ये बांधण्यात आलेली असून त्यामध्ये ४० प्रशिक्षणार्थीची निवासाची व्यवस्था आहे. सदर निवास व्यवस्था अपुरी असल्याने आवश्यक सोयीसुविधांनीयुक्त १०८ प्रशिक्षणार्थी निवासव्यवस्था असलेले नवीन वसतिगृह प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यामध्ये भोजनकक्ष, स्वयंपाकगृह, भोजनालय, कर्मचाऱ्यांकरिता डॉरमेटरी, इनडोअर गेमसाठी हॉल, योगा व सांस्कृतिक हॉल इ. बाबींचा समावेश असणार आहे. सदर नवीन वसतिगृहसाठी रु.१३६४.५६ लक्ष /- निधी उपलब्ध करुन देणेबाबत संचालक, वनामती यांनी दि.२६.०७.२०२३ रोजीच्या पत्रान्वये संचालक (आत्मा) यांना प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने संचालक(आत्मा) यांनी सदर

प्रकरणी रु.१३६४.५६ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत व रु.३००.०० लक्ष निधी उपलब्ध करुन देणेबाबत विनंती केली आहे. सदर बांधकाम कामासाठी, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण, मुंबई यांच्याकडून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता घेण्यात आल्याचे सदर पत्रात नमुद केले आहे.

सन २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम)३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.६००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार एप्रिल ते डिसेंबर, २०२३ या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्प निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे.

त्यानुषंगाने रामेती खोपोली संस्थेच्या प्रस्तावित नविन वसतिगृह बांधकामासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम)३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.१३६४.५६ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :-**

१. रामेती खोपोली संस्थेच्या प्रस्तावित नविन वसतिगृह बांधकामासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम)३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत **रु.१३६४.५६ लक्ष (एकूण रुपये तेरा कोटी चौसष्ट लक्ष छप्पन हजार फक्त)** निधीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ मध्ये मंजुर झालेल्या अनुदानाखाली खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३, २४०१, पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण, (०१)(४७) वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( २४०१ २६४९ )**

३. या आदेशान्वये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम)३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेकरिता वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भात संचालक(आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०७११४७३०४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.08.07 11:48:56 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. अमुस (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
३. आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
५. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. सर्व विभागीय कृषी सह संचालक
१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
११. प्राचार्य, रामेती खोपोली
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१३. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१४. नियोजन विभाग का.१४३२, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवड नस्ती ३-अे.